**“महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील महानगरपालिकांना अनुदान वितरीत करण्याबाबत.**

सन २०१७-२०१८ साठी लेखाशिर्ष (३६०४ ०९४२) खाली रक्कम रू.१३८५.२७ कोटी.(माहे जुलै-२०१७ करीता)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-जीएसटी-२०१७/प्र.क्र.९२/न.वि.-३२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :-४ जुलै, २०१७.**

**वाचा :-**

(१) वित्त विभाग महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग चार-ब, २९ जून,२०१७

(२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३,दिनांक १८ एप्रिल,२०१७.

(३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३ दिनांक ३० जून,२०१७

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने अधिसूचित केल्यानुसार संपूर्ण देशात वस्तु व सेवा कराची अंमलबजावणी दिनांक १ जुलै,२०१७ पासून सुरू झाली आहे.त्यानुसार राज्यातही वस्तु व सेवा कराची अंमलबजावणी सुरू झाली असून, भारताचे संविधानाच्या सातव्या अनुसूचीच्या सूची-दोन मधील (राज्य सूची) पूर्वीच्या नोंद ५२ अन्वये आकारण्यात व वसूल करण्यात येणारा प्रवेश कर, जकात, स्थानिक संस्था कर,उपकर किंवा इतर कोणताही कर बंद करण्यात आला आहे. त्याअनुषंगाने स्थानिक प्राधिकरणास भरपाई देण्याबाबतचा महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७ दिनांक १ जुलै,२०१७ पासून अंमलात येत असल्याबाबत संदर्भाधीन क्र. (१) अन्वये वित्त विभागाने महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध केले आहे.सबब, “महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक

प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७" अंतर्गत राज्यातील महानगरपालिकांना भरपाई अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

"महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७" अंतर्गत राज्यातील २६ महानगरपालिकांना सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ नुसार माहे जुलै-२०१७ करीता **एकूण रक्कम रू. १३८५.२७ कोटी** इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेले हे अनुदान हे महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७ मधील तरतूदीनुसार समायोजित करण्यात येईल.

३. या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे महानगरपालिकांना वितरण करण्यासाठी श्री. सुधाकर बोबडे, उप सचिव , (न.वि.-५) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्रीमता शैलजा स. शिरोडकर कक्ष अधिकारी, (नवि-५) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-४, मुख्य लेखाशिर्ष ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (०१) स्थानिक संस्था कराच्या (एलबीटी) महानगरपालिकांना राज्याचे अर्थसहाय्य, ३१ , सहायक अनुदाने (वेतनेतर) (३६०४ ०९४२) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-२०१८ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. असे प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३,दिनांक १८ एप्रिल,२०१७ मधील लागू होणा-या सर्व अटी व शर्थीची पूर्तता करण्यात आली आहे.

६. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दिनांक १८ एप्रिल,२०१७ व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३ दिनांक ३० जून,२०१७ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णयानुसार वितरीत करावयाच्या निधीचा रक्कम ही ७०% च्या मर्यादेत आहे.

८. सदरचा शासन वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८/२०१७/कराधान-१ दिनांक ०४ जुलै,२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०४१४३०३३७९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = UNDER SECRETARY
Date: 2017.07.04 14:55:40 +05'30'

(विवेक कुंभार)

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
३. सर्व आयुक्त, महानगरपालिका
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
५. सर्व विभागीय आयुक्त
६. संबधित जिल्हाधिकारी
७. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव

८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४. उप सचिव , कराधान-१ , वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
१५. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१६. कार्यासन न.वि.-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (न.वि.-३२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

## शासन निर्णय क्रमांक-जीएसटी-२०१७/प्र.क्र.९२/न.वि.-३२ सोबतचे प्रपत्र-अ

| अ.क्र. | महानगरपालिकेचे नाव | मंजूर अनुदान (रू. कोटी) |
|---|---|---|
| १ | बृहमुंबई | ६४७.३४ |
| २ | मिरा-भाईदर | १९.५१ |
| ३ | जळगांव | ८.७४ |
| ४ | नांदेड-वाघाळा | ५.६८ |
| ५ | वसई-विरार | २७.०६ |
| ६ | सोलापूर | १८.६० |
| ७ | कोल्हापुर | १०.३५ |
| ८ | औरंगाबाद | २०.३० |
| ९ | अहमदनगर | ७.१२ |
| १० | उल्हासनगर | १२.८५ |
| ११ | अमरावती | ७.८२ |
| १२ | कल्याण-डोबिंवली | १९.९२ |
| १३ | चंद्रपुर | ४.४९ |
| १४ | परभणी | १.५४ |
| १५ | लातुर | १.२५ |
| १६ | पुणे | १३७.३० |
| १७ | पिंपरी-चिंचवड | १२८.९७ |
| १८ | नागपुर | ४२.४४ |
| १९ | ठाणे | ५९.३० |
| २० | नवी मुंबई | ७७.९२ |
| २१ | सांगली-मिरज-कुपवाड | १०.९५ |
| २२ | भिवंडी-निजामपुर शहर | १८.१० |
| २३ | मालेगाव | ११.६८ |
| २४ | नाशिक | ७३.४० |
| २५ | धुळे | ७.३४ |
| २६ | अकोला | ५.२९ |
| **एकूण** | | **१३८५.२७** |